राष्ट्रीय कृषि विकास योजनेखाली राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियांनातर्गत दूधगंगा सहकारी दूध संघ, इंदापूर, जि.पुणे या संघास बळकटीकरण, विस्तारीकरण व आधुनिकीकरणासाठी मंजूर प्रकल्पाच्या वाढीव घटकांसाठी मान्यता व निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३ /प्र.क्र. ७६ /पदुम-८**

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीखः १२ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :** १) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ८.८.२०१३

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.१०.२०१३, दिनांक ३.१२.२०१३

३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २२.१.२०१४

४) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र.आदुवि-६/RKVY/SPDD-NMPS/भाग-४/२०१४-१५/२८, दिनांक ३१.१.२०१५

५) आयुक्त,कृषि यांचे जा.क्र.नि/प्र.क्र.५२/ राकृवियो कक्ष/निधी वा./१४-१५/६०/२०१५ , दि.२२.१.२०१५ चे पत्र

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत दूध व्यवसाय करणा-या सहकारी संस्थांचे बळकटिकरण, विस्तारीकरण, आधुनिकीकरण करण्याकरीता राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानाखाली संदर्भ क्रमांक १ व ३ च्या शासन निर्णयान्वये दूधगंगा सहकारी दूध संघ, इंदापूर, जि.पुणे यांना रु.६१७.०२ लक्ष इतक्या रकमेचा प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. दूधगंगा सहकारी दूध संघ, इंदापूर, जि.पुणे या संघाच्या मंजूर रु.६१७.०२ लक्ष रक्कमेच्या प्रकल्पासाठी राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्सा रु.४६२.७६ लक्ष (७५%) व संघ हिस्सा रु.१५४.२६ लक्ष (२५%) इतका निश्चित करण्यात आला आहे. त्यापैकी रु.२४५.९० लक्ष इतका निधी राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापोटी सन २०१३-१४ मध्ये वितरीत करण्यात आला असून रु.२१६.८६ लक्ष इतका निधी वितरीत करणे शिल्लक आहे.

आता संदर्भ क्रमांक ४ मधील पत्रान्वये आयुक्त ,दुग्धव्यवसाय विकास यांनी दूधगंगा सहकारी दूध संघ, इंदापूर यांचा प्रकल्पातील मंजूर बाबींमध्ये निविदा प्रक्रियेमुळे झालेल्या रु.८५,३४,१००/- इतक्या बचतीमधून काही नवीन घटकांचा समावेश करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असून त्यास शासनाची मान्यता द्यावी अशी विनंती केली आहे. याव्यतिरिक्त राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून संघास राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापोटी रु.२१६.८६ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये दूधगंगा सहकारी दूध संघ म., इंदापूर, जि.पुणे या संघास राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापोटी केंद्र शासनाकडून सन २०१४-१५ साठी उपलब्ध करुन देण्यात निधीमधून रु.२१६.८६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देत आहे. सदर वितरीत निधी अनुषंगाने संघ हिस्स्यापोटीचा २५ टक्के म्हणजेच रु.७२.२६ लक्ष इतका निधी दूध संघाने गुंतविणे आवश्यक राहील.

तसेच दूधगंगा सहकारी दूध संघ म., इंदापूर, जि.पुणे या संघास मंजूर केलेल्या प्रकल्पात मंजूर बाबींमधील निविदा प्रक्रियेनुसार झालेली रु.८५,३४,१००/- इतकी बचत संघाच्या दूध प्रक्रिया यंत्रणेसाठी खालील घटकांसाठी खर्च करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देत आहे.

(रुपयात)

| **अ.क्र.** | **घटक** | **प्रस्तावित निधी (लक्ष)** |
|---|---|---|
| १ | कर्ड व लस्सी | ३०,५२,४००/- |
| २ | पनीर प्रोसेस | १४,२७,७००/- |
| ३ | श्रीखंड व खवा | ९,३०,७००/- |
| ४ | घी सेक्शन | ३०,२०,५००/- |
| ५ | फ्लेवर्ड मिल्क सेक्शन | १४,९४,५००/- |
| | **एकूण** | **९९,२५,८००/-** |

**अटी व शर्ती -**

१. मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्याकरीता अटी व शर्ती हया दिनांक ८.८.२०१३ व दिनांक २२.१.२०१४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

२. प्रकल्पात मंजूरी प्रदान केलेल्या मर्यादेपेक्षा अधिकचा निधी शासनामार्फत अनुदान म्हणून मंजूर करण्यात येणार नाही. तसेच उपरोक्त मंजूर घटकांसाठी होणारा जास्तीचा खर्च हा संघाने स्वनिधीतून स्वत: करणे आवश्यक राहील.

३. संघाने सदर प्रकल्प विहित कालावधीत कार्यान्वित करुन वितरीत करण्यात आलेला निधी विनियोग केला असल्याबाबतचे विहित नमुन्यातील अंतिम लेखापरीक्षित उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्पाचे अंतिम पूर्णत्व प्रमाणपत्र संबंधित जिल्हयाच्या दुग्धव्यवसाय विकास अधिकारी / प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास यांनी संघाकडून प्राप्त करुन घ्यावे व ते शासनास सादर करावे. तसेच प्रकल्पाच्या प्रगतीबाबत आढावा घेण्यासाठी त्रैमासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल छायांकितप्रतीसह आयुक्त दुग्धव्यवसाय विकास व शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५१०३५१३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2015.02.12 15:20:23 +05'30'

**(श.मा.साठे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.मंत्री (कृषि ), मा.मंत्री (पदुम), मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव

४) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

५) मा.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

६) आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे

७) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे

८) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८

९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई

१०) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे विभाग, पुणे

११) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे

१२) जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे

१३) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, पुणे

१४) जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, पुणे

१५) महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर

१६) कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई

१७) व्यवस्थापकीय संचालक, दूधगंगा सहकारी दूध संघ म., इंदापूर, जि.पुणे

१८) निवड नस्ती